सा. ले. ३६६ }
सु. १०८० साबान १५ }

(२३३४=२२२० अ)
नेमपत्र

{ श. १६०१ माघ व. २
{ इ. १६७९ फेब्रु. ६

की अथणीच्यां पेठेबद्दल नियम, देवालयीं समस्त क्षेत्र बसोन, झाला कीं, एक मूठ मिरें, सुपारी लाभ व उगट घेत देत जाणें. नवी जिकीर न करणें. हे नेमउत्तर सोडील तो सिवाचारकुलाचारावेगळा व छपन्न देशाचे दैवावेगळा.

खं. ८ ले. ३७ }

(२३३५)
हकीकत

बेदरीं निळोपंत कयाळनिशी करीत होते. त्यांस तपे सोनवळची ठाणेदारी व मजमू दिल्ही. तेव्हां, महाद परभू हा तेथील अदकारी त्यानें, कसाला पडला म्हणून वतन श. १४४५ मध्यें १३ ह. टक्के घेऊन निळोपंत यास दिलें. पुढें कळोपंत बिन नागोजीपंत यास कारकुनीवर ठेवून आपण हुजूर मोसबियास आले. तिकडे ८।१० वर्षे राहणें पडलें. नंतर परत येतांना सरखोती मिळाली. इकडे येतांच कळोपंत व निळोपंत यांचा कलह लागून कळोपंताचा नातू मुरार सोमाजी यानें मारेकरी घालून निळोपंताचा पुत्र नारोपंत यास बायकामुलें यांसह मारिले. नारोपंताची स्त्री आपलें मूल सोनाजी घेऊन पुण्यास आली. सोनाजी व त्यांचे पुत्र निळोजी हे वतनावर गेले नाहींत. छत्रपतींच्या पदरीं राहिले. पुढें मानजी मुरारीचा व आपला ( रामचंद्र निळकंठ याचा ) वतनाबद्दल तंटा लागून कल्याणीचा सुभेदार जूनदअल्ली याजपुढें गोतासमक्ष निकाल होऊन वतन आमचें खरें असें ठरलें. मादाणे, कुकसें इत्यादि गांवें व तेथील मानपान.

(से) फॅ. रे. सुरत }
भा. ९०–२ पृ. २८ इ. }

(२३३६)
सुरत–फो. सें. जॉर्ज

{ श. १६०३ चैत्र व. २
{ इ. १६८१ मार्च २६

बादशहानें आमच्यावर चढविलेली १½ टका जकात अजून कमी झाली नाहीं आणि होईल अशी आशाहि वाटत नाहीं. कारण गेलीं कित्येक वर्षें मुसलमानांपासून जकाती घेण्याचें बंद होतें; त्याऐवजीं आतां त्यांपासून शेंकडा २½ टक्के घेण्यास सुरवात झाल्याचें कळलें. बादशहाला पैशांची मोठी टंचाई भासूं लागल्यामुळें हा उपक्रम त्यानें केला आहे. **शिवाजी** आणि रजपूत या उभयतांशीं दीर्घकाळ युद्धें करावीं लागल्यामुळें त्याचा खजीना रिकामा झाला. त्यांतून त्याचा तिसरा पुत्र अकबर बंड करून रजपुतांना मिळाल्यामुळें अनेक तऱ्हेचे गोंधळ माजतील अशी भीती वाटते.

डाग रजिस्टर ११६८ }
पृ. ३८२ इ. जून २१ न्यू. }

(२३३७)

{ श. १६०३ आषाढ शु. ६
{ इ. १६८१ जून ११

सद्रंगपट्टणच्या १९ मार्चच्या पत्रांत सर्वत्र शांतता असल्याची बातमी आहे. तथापि **शिवाजीचें** सैन्य विजापूर व गोवळकाँडा याच्या रोखानें येत आहे त्यापासून

जबरदस्ती किंवा लूट अशा सारखा कांहीं त्रास होण्याचा संभव आहे. याशिवाय लिंगोजी सांगरसोच्या अमलाखालीं सर्व कांहीं ठीक आहे.

(से) फॅ. रे. सुरत
भा. ९०-२ पृ. ४६ इ. } (२३३८) सुरत-मुंबई { श. १६०३ आषाढ व. ४ इ. १६८१ जून २५

तुमच्या इच्छेप्रमाणें मायकेलच्या पुस्तकांतून उतारा व **शिवाजीच्या** हिशेबाची नक्कल राजापूरच्या वखारांतून जशीच्या तशी करून पाठविली आहे. त्याच्या मुलाकडून ह्या सर्व हिशेबाचा उलगडा करण्यांत तुम्हांला यश येवो अशी आमची इच्छा आहे.

(से) फॅ. रे. सुरत
भा. ९०-३ इ. } (२३३९) सुरत-कंपनी. { श. १६०३ माघ व. १० इ. १६८२ जाने. २३

[पृ. १२] अनेक अडचणींनंतर सरतेशेवटीं आम्हीं राजापूरची वखार संपूर्णपणें काढून घेतली आहे.

[पृ. १७] तुमच्या इतर कोणत्याहि कारभारापेक्षां तुमच्या मुंबई बेटाचा आम्हांला फार भार वाटतो. शिवाजी, मोंगल बादशहा आणि उर्मट पोर्तुगीज हे सर्व दुष्ट लोक शेजारीं असल्यामुळें त्यांच्याशीं शांतता राखणें हें मोठें कठीण काम होऊन बसलें आहे. **शिवाजी**-(किंवा आतां संभाजी म्हणणें अधिक उचित होईल) शीं खांदेरीउंदेरीच्या बाबतींत उद्भवलेला तंटा हें एक ह्याचें चांगलें उदाहरण आहे. ह्या चकमकींत ले. थॉर्पच्या अविचारी साहसामुळें तो आणि दुसरे बरेच लोक प्राणास मुकले. खांदेरी आणि उंदेरी हीं खडकाळ बेटें त्या वेळेपर्यंत ओसाड असून त्यांचेकडे कोणींहि लक्ष दिलें नव्हतें. त्यांच्या बाबतींत **शिवाजी**-चा आमचा तंटा कशामुळें आणि कोणत्या मुद्यांवर होता हें तुम्हांला न कळविल्याबद्दल प्रेसिडेंट व कौन्सिल यांवर (आम्हांवर) ठपका ठेवण्यांत आला आहे. परंतु त्यावेळीं किंवा आतांहि, त्यांच्या या कृत्याला महत्वाकांक्षा किंवा कांहीं राजकारणी धोरण याव्यतिरिक्त [ हक्क आदिकरून ] दुसरें कांहीं कारण होतें, याची आम्हांला जाणीव नव्हती किंवा नाहींहि. आणि यामुळें थॉर्पचा मृत्यु आदिकरून झालेल्या नाशाबद्दल आम्हीं दोषाला पात्र होत नाहीं. वास्तविक, ह्या थॉर्प प्रकरणाबाबत मुंबईहून पत्र येईपर्यंत शिवाजीनें ती जागा आपल्या ताब्यांत घेतल्याचेंहि आम्हांला कळलें नव्हतें. त्या वेळचा डेप्युटी गव्हर्नर हेन्री ऑक्झिडेन, हल्लीं विलायतेंत आहे, तो याबद्दल आपली खात्री करून देईल. यद्यपि आपलीं जहाजें इंग्लंडहून यावयाच्या वेळेलाच हा तंटा उपस्थित झाला आणि त्यांचा या कामीं उपयोग करण्याला, जरी, तीच वेळ फार योग्य अशी होती, तथापि आम्हीं तसा हुकूम देऊं शकलों नाहीं; किंवा 'न्यू लंडन' जहाजावरून जॉन [illegible]इल्ड डे० ग० होऊन जाईपर्यंत तशा तऱ्हेची सूचना मुंबईकडूनहि आम्हांला करण्यांत आली नव्हती. [आणि जेव्हां तशी सूचना देण्यांत आली] तेव्हां 'अॅन' व 'बेंगाला' ही दोन्ही जहाजें

हिंदुस्तानच्या किनाऱ्यानें खालीं रवाना झालीं होतीं. बरें, 'जहाजांनीं त्या बेटांवर मारा केल्यास तें हस्तगत होण्याचा संभव आहे' एवढाच त्यांच्या सूचनेचा इत्यर्थ होता. परंतु असें करणें तितकें सोपें नव्हतें. या ( मोंगल ) बादशहाचें एवढें मोठें आरमार, कीं ज्यामध्यें अनेक मोठीं जहाजें व पुष्कळ सैन्य असलेलीं अनेक लहान गलबतें सज्ज होतीं; तें शिवाजीचें कांहींच नुकसान करूं शकलें नाहीं. किंवा तुमच्या तोफांमुळें त्याचें किनाऱ्यावरील दळणवळण न थांबतां, सैन्य आणि सामुग्री पुरविण्याचा त्याचा क्रम अप्रतिहत चालूच होता. कारण, तें ठिकाणच अशा जागीं आहे कीं, मोठ्या जहाजांना तेथें जाणें शक्य नव्हतें. आणि लहान होड्यांकडून कार्यभाग करून घ्यावयाचा तर त्यांच्या सोईची उतरण्याची एकच सुरक्षित जागा असून तेथें प्रयत्न करणें [ शत्रूच्या बंदोबस्तामुळें ] धोक्याचें झालें असतें. आणि शिवाय आमच्या सनदेमध्यें अशा प्रसंगांची अंशतः तजवीज केलेली असली तथापि तसें [ युद्ध ] करण्यास आम्हांला भरपूर अधिकार होते असें आम्हांला वाटलें नाहीं. डेप्युटी-कौन्सिल आणि प्रेसिडेंट-कौन्सिल यांच्यामध्यें झालेला २७ ऑगस्ट १६७९ पासून ३१ जानेवारी १६८० रोजीं शिवाजीशीं तह झाल्याची हकीकत आम्हांला कळवीपर्यंतचा, पत्रव्यवहार मागवून आपण वाचला तर, त्या प्रसंगाला योग्य अशा पायऱ्यांनींच आम्हीं उपक्रम केला आणि निष्कारण आपलीं गलबतें तेथें पाठवून तीं भरण्यांत व विलायतेला पाठविण्यांत होणारी निराशा व नुकसान टाळलें; व त्यामुळें इतकें यश मिळालें असेंच आपल्यास वाटेल. यापुढें आपल्याला मुंबई बेटाचा ताबा राखावयाचा असेल आणि त्याचें उत्पन्न व खर्च यांचा मेळ रहावा अशी इच्छा असेल तर शिवाजीचें खांदेरीहून आणि मोंगलांचें उंदेरीहून उच्चाटण केलें पाहिजे. एवढेंच नव्हे, तर पोर्तुगीजहि अधिक चांगले व मित्रत्वानें वागतील असें कांहीं केलें पाहिजे. नाहींतर ती दुर्दैवी आणि अतुलनीय जागा (मुंबई बेट) संकट व धोका यांचें कायमचें स्थान होऊन बसेल.

| | | |
|---|---|---|
| (से) फॅ. रे. सुरत भा. ४-३ पृ. ३५ इ. | (२३४०) सुरत कन्सल्टेशन. | श. १६०४ चैत्र व. ५ इ. १६८२ एप्रील १७ |

ल्यूसिया डी सूझा ( दारूचा मक्तेवाला ) यानें शिवाजीच्या युद्धांत ( खांदेरी उंदेरी प्रकरणीं ) आपले उत्पन्नावर अनिष्ट परिणाम झाला अशी तक्रार केली. त्याच्या अर्जाचा विचार झाला.

## सार-संग्रह

# सूची

[ नांवापुढील आंकडे लेखांकांचे आहेत. ]

## सार-संग्रह-सूची

## सार-संग्रह-सूची

## शिवाजी व राष्ट्रें

## शिवाजी व व्यक्ति

**शिवाजी व स्थलविशेष.**

ह

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ, पुणें.

[ पुणें–सदाशिव पेठ ३१४, खुन्या मुरलीधराचे पलीकडे, शिवाजीमंदिरामागें ]

## [ स्थापना शके १८३२ ]

### सन १८६० च्या २१ व्या म्ह० सोसायटीज् रेजिस्ट्रेशन ॲक्टान्वयें नोंदलेलें.

**स्थापना**—सुमारें चाळीस वर्षे महाराष्ट्रांत स्वेतिहाससंशोधनाची खटपट पुष्कळ एतद्देशीय विद्वानांनीं आपापल्यापरी केलेली आहे. त्यांची कामगिरी बिनमोल झाली याविषयीं वाद नाहीं. परंतु बारीक विचार केला तर झालेलें काम राईएवढें तर व्हावयाचें काम डोंगराएवढें, असें म्हणण्यांत खचित अतिशयोक्ती नाहीं. अर्थात् एकेकटा सुटा संशोधक म्हणजे समुद्र आटवूं पाहणाऱ्या टिटवीप्रमाणें भासूं लागतो. यास्तव 'संघे शक्तिः कलौ युगे' हा न्याय अनुसरून सर्व इतिहासप्रेमी व इतिहाससंशोधक मंडळींची एक संस्थाच स्थापावी असा विचार होऊन शके **१८३२ सालीं आषाढ शु. १ स 'भारत-इतिहास-संशोधक-मंडळ'** या नांवाची संस्था स्थापन झाली. प्रसिद्ध पंडित **कै. रा. ब. गणेश व्यंकटेश जोशी**, बी. ए. व **कै. रा. ब. काशिनाथ नारायण साने**, बी. ए. हे या मंडळाचे अनुक्रमें पहिले व दुसरे अध्यक्ष होते. त्यानंतर **श्री. चिंतामण विनायक वैद्य**, एम्. ए., एल्एल्. बी., यांची शके १८५१ सालीं अध्यक्षस्थानीं योजना झाली.

**उद्देशः**—कांहीं वर्षे काम केल्यावर संस्था शके १८३८ सालीं ( ता. ९।१०।१६ ) सो. रे. आक्टाप्रमाणें नोंदण्यांत आली. त्यावेळीं संस्थेचे उद्देश येणेंप्रमाणें ठरविलेः—

( **श्री** ) भारतवर्षासंबंधीं ऐतिहासिक साधनें म्हणजे कागदपत्र, दस्तऐवज, बखरी, कैफियती, शिलालेख, जुने हस्तलेख, सर्व प्रकारचे सारस्वत ग्रंथ, कलाकुसरीचीं कामें, नाणीं, ताम्रपत्रें, मूर्ती, शिल्पकल्पें, चित्रें आणि इतर हरतऱ्हेच्या ऐतिहासिक महत्वाच्या वस्तू जमा करणें व संरक्षिणें.

( **ग** ) असलीं सर्व साधनें संरक्षिण्याकरितां व प्रदर्शिण्याकरितां योग्य इमारती उभारणें.

( **णे** ) अशीं साधनें प्रसिद्ध करणें, त्याचप्रमाणें ऐतिहासिक संशोधनाचें कार्य जोरावण्याजोगे इतर ग्रंथ प्रसिद्ध करणें व भारतवर्षासंबंधीं ऐतिहासिक ग्रंथ व लेख प्रसिद्ध करणें.

( **शा** ) हिंदुस्थानच्या इतिहासासंबंधीं संशोधन व त्याचा चिकित्सापूर्वक अभ्यास जेणेंकरून बळावेल व उत्तेजित होईल असे मंडळाला जरूर अगर योग्य वाटतील ते अन्य उपाय योजणें.

(१) प्रतिवर्षी ३०० रु. अगर अधिक वर्गणी मंडळास देणारा आश्रयदाता सभासद होय. (२) सालीना १२५ रु. अगर अधिक वर्गणी मंडळास देणारा हितकर्ता सभासद होय. (३) सालीना २५ रु. देणारास सभासद वर्ग १ म्हणावें. (४) सालीना १२ रु. देणारास सभासद वर्ग २ म्हणावें. (५) सालीना ६ रु. देणारास सभासद वर्ग ३ म्हणावें. (६) सालीना ३ रु. देणारास सभासद वर्ग ४ म्हणावें.

कोणत्याहि दराच्या **दसपट** वर्गणी एका व चालू वर्षांत देणारांस त्या वर्गाचे **तहाहयात** सभासद समजण्यांत येईल.

# भारत-इतिहास-संशोधक-मंडळ-स्वीय-ग्रंथमाला.

* अशी खूण केलेले ग्रंथ मुंबई सरकारनें प्राथमिक व दुय्यम शाळांच्या पुस्तकालयासाठीं मंजूर केले आहेत.

| मालांक | किंमत रु. |
|---|---|
| १ अहवाल (शके १८३२) | ३ |
| २ ,, (शके १८३३) | ५ |
| +३ दुबंतविचार (रा. वि. का. राजवाडे) | १० |
| ४ वार्षिक इतिवृत्त (शके १८३४) | ५ |
| ५ मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खंड १२ (रा. राजवाडे) | १०८ |
| *६ प्रथमसंमेलनवृत्त (शके १८३५) | ०१२ |
| *७ वार्षिक इतिवृत्त (शके १८३५) | ६ |
| *८ द्वितीय संमेलनवृत्त (शके १८३६) | ३ |
| *९ वार्षिक इतिवृत्त (शके १८३६) | ३ |
| *१० मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें खं. २० (शिवकालीन घराणीं) | ३ |
| *११ वार्षिक इतिवृत्त (शके १८३७) | ६ |
| *१२ तृतीयसंमेलनवृत्त (शके १८३७) | ३ |
| *१३ मुकुंद-महाभाष्य (संस्कृत) | ०८ |
| *१४ ग्रंथराज (दासोपंत) ,, | ०८ |
| *१५ स्फुट प्रकरणें भाग १ ला | ०१२ |
| *१६ स्फुट प्रकरणें भाग २ रा | ०१२ |
| भा. इ. सं. मं. **त्रैमासिकः**-१८४२ १८४३।४४।४५।४६।४७।४८।४९ ५०।५१ | प्रत्येकीं रु. ३ |

| मालांक | किंमत रु. |
|---|---|
| *१७ वार्षिक इतिवृत्त (शके १८३८) | ३ |
| १८ चतुर्थसंमेलनवृत्त (शके १८३८) | ४ |
| *१९ राजवाडे-खंड-स्थलसूची (१८३९) | ४ |
| *२० पंचमसंमेलनवृत्त (शके १८३९) | ३ |
| २१ संशोधनसंग्रह (१८३९) | छा. आहे. |
| २२ चंद्रचूड-दफ्तर-कलम १ | ३ |
| २३ महाराष्ट्रसारस्वत | (संपलें) |
| २४ षष्ठसंमेलनवृत्त (१८४०) | ४ |
| २५ सप्तमसंमेलनवृत्त (१८४१) | ३ |
| २६ संशोधकाची छोटी जंत्री (रा. द. वि. आपटे) | ०४ |
| २७ प्रदर्शनपरिचय | ०४ |
| *२८ फारशी पत्रव्यवहार मूळ व भाषांतर (कंपनी व पेशवे) | ५ |
| २९ फार्शी-मराठी-कोश | ४ |
| ३० शिवचरित्रसाहित्य खंड १ ला | १०८ |
| ३१ Historical Miscellany. | १ |
| ३२ पुरंदरे-दप्तर-भाग १ कृ. वा. पुरंदरे (छत्रपती राजाराम ते पानिपत अखेर.) | ४ |
| ३३ शिवचरित्रसाहित्य खं. २ रा | छा. आहे. |

**इतर पुस्तकें:-वासुदेवशास्त्री खरे-कृतः**-(१) अधिकारयोग किं. ०१०; ऐति. ले. संग्रह खंड ५ ते ११ किं. ३ ते ४ **राजवाडेकृतः**-'मराठ्यांच्या इतिहासाचीं साधनें' खंड १, ५, ७, ११, १३ व १४, १५ किं. अनुक्रमें रु. +१०, +१०, ३, २॥, +१, २, ५ **काव्येतिहाससंग्रह**-मुक्तेश्वर-वनपर्व ४, वामनपंडित-स्फुट प्र. ३, अनेककविकृत स्फु. प्र. भाग १ व २ किं. रु. ३, समर्थकृत रामायणें व इतर प्रकरणें रु. २ व **भारतवर्षः**-वर्ष १, अंक १ व ४-१२ किं. प्र. ०१२. **चित्रें:**-थोरले बाजीराव नऊरंगी किं. ०८; पिलाजी जाधवराव व श्री. शिवाजी महाराजांचा होन. ०८. मंडळ पुरस्कृतग्रंथमालेंतील सर्व पुस्तकें सभासदांस सवलतीनें मिळतील.

---

**टीपः**-ट. हं. व बंगी व्ही. पी. वगैरे खर्च निराळा पडेल. घाउक घेणारांस चांगलें कमिशन देऊं माहितीपत्रक मागवा. +दुर्मिळ सबब वाढविलेल्या किंमती.

# त्रिशतसांवत्सरिक शिवस्मारक ग्रंथावली.

[नांवें हातीं आलीं त्या क्रमानें दिलीं आहेत.]

## देणगीदार

| | | |
|---|---|---|
| १ | रायगड स्मारक मंडळ, पुणें | २५०० |
| २ | श्रीमंत चीफ ऑफ जमखिंडी | १५१ |
| ३ | श्रीमंत चीफ ऑफ सांगली | १२५ |
| ४ | श्रीमंत बाबासाहेब इचलकरंजीकर | १०० |
| ५ | श्रीमंत बाळासाहेब मिरजकर | १०० |
| ६ | श्रीमंत चीफ् ऑफ फलटण | १०० |
| ७ | श्रीमंत चीफ ऑफ् भोर | १०० |
| ८ | श्री. चिंतामण विनायक वैद्य | १०० |
| ९ | श्री. नामदार केशवराव कोरटकर–हैद्राबाद | १०० |
| १० | श्री वामन रामचंद्र नाईक (आश्रयदाते) | १४२ |
| ११ | श्री. शंकर भिकाजी ढवळे | १०० |
| १२ | श्री. अनंत गणेश कर्वे, डेंटिस्ट | १०० |
| १३ | महाराष्ट्र समाज दिल्ली | ३० |
| १४ | शिवजयंत्युत्सव मंडळ, मिरज | २५ |
| १५ | रा. सा. कीर्तने, पुणें | २५ |
| १६ | श्री. रामचंद्र पांडुरंग वैद्य, पणजी–गोवें | २५ |
| १७ | गणेश वासुदेव मावळणकर, अहमदाबाद | ५१ |

## आश्रयदाते

१ श्री. पांडुरंग केशव शिराळकर, कऱ्हाड
२ ग्रंथोत्तेजक मंडळ, इंदूर
३ भारत इतिहास संशोधक मंडळ, पुणें
४ चित्रशाळा छापखाना, पुणें
५ श्रीमंत आप्पासाहेब हुनगुंदीकर,
६ नेकनामदार गव्हर्नर एस्. बी. तांबे, मध्यप्रांत
७ श्री. यशवंत विष्णु नेने, मुंबई
८ श्री. पुरुषोत्तम दिनकर जोशी, मद्रास
९ श्रीमंत सेनापतीसाहेब, संस्थान कापशी
१० श्री. धोंडो कृष्ण साठे, पुणें
११ रा. सा. विनायक त्रिंबक आगाशे, पुणें
१२ श्री. स. खंडेराव चिंतामण मेहेंदळे, पुणें

## आगाऊ ग्राहक-सर्वसंग्रह.

१ श्रीमंत चीफ् ऑफ औंध ५ प्रती
२ श्री. भास्कर वामन भट वकील, धुळें
३ प्रो. जयराव एस्. नरगुंद, बागलकोट
४ प्रो. पां. स. पिसुर्लेकर, पणजी.
५ प्रो. शंकर वामन दांडेकर, पुणें
६ श्रीमंत सरदार आबासाहेब मुजुमदार, पुणें
७ प्रि. जगन्नाथ-रघुनाथ घारपुरे, मुंबई
८ प्रो. नारायण केशव बेहेरे, नागपूर
९ रा. सा. गंगाधर केशवराव देशपांडे, पुणें
१० श्री. व्यवस्थापक ब्रह्मचर्याश्रम, मसूर.
११ श्री. यशवंत खुशाल देशपांडे, यवतमाळ
१२ चिटणीस, ज्युबिली लायब्ररी, यवतमाळ
१३ श्री. माधव नारायण दाऊ, दारव्हा
१४ चिटणीस, सांगली जनरल लायब्ररी, सांगली
१५ प्रिन्सिपाल, सर परशुराम भाऊ कॉलेज, पुणें
१६ श्री. गणेश वासुदेव मावळणकर, अहमदाबाद
१७ श्री. नारायण गणेश जोशी, जानशी, ( रत्नागिरी ).
१८ सुपरिटेंडंट, महाराष्ट्र एज्युकेशन सोसायटी हायस्कूल
१९ श्री. एम्. बी. परांजपे, सबजज्, अकोट
२० श्री. एस्. एस्. पुराणिक, क्वेटा
२१ श्रीमंत सरदार विश्वनाथ खंडेराव रास्ते
२२ प्रिन्सिपाल फर्गसन कॉलेज, पुणें
२३ चिटणीस प्राज्ञपाठशाळा, वाई
२४ सेक्रेटरी रिपन हॉल लायब्ररी, सोलापूर
२५ सेक्रेटरी सार्वजनिक वाचनालय, अलीबाग
२६ विनायक नारायण परांजपे, धुळे
२७ श्रीमंत सरदार चंद्रोजीराव संभाजीराव आंग्रे, ग्वाल्हेर ३ प्रती
२८ सरदार आनदराव भाऊसाहेब फाळके, ग्वालेर
२९ जनरल नानासाहेब शिंदे, बडोदें
३० सरदार बापूसाहेब विंचुरकर, पुणें
३१ युनिव्हर्सिटी लायब्ररी, मुंबई
३१ युनिव्हर्सिटी रजिस्ट्रार, नागपूर
३३ श्री. नारायण बळवंत जोशी, विजापूर
३४ सुपरिटेंडंट आर्किआलॉजी, ग्वालेर
३५ सरदार मालोजीराव नरसिंगराव शितोळे, देशमूख
३६ नरेंद्र देव, काशी विद्यापीठ, बनारस
३७ रा. ब. आर. के. भोसले, मद्रास
३८ डॉ. गोपाळ सदाशिव पळसुले, पुणें
३९ श्री. नारायण विठ्ठल केळकर, मुंबई
४० नूतन मराठी शाळा, पुणें
४१ हरीभाई देवकरण हायस्कूल, सोलापूर
४२ सेक्रेटरी, फॉरीन डिपार्टमेंट, इंदूर
४३ श्री. त्रिंबक भास्कर खरे, मुंबई.
४४ त्र्यंबक केशव जोशी, वकील, संगमनेर